# सायकलस्वार

लेखक: ॲलन से
मराठी अनुवाद: सुशील मेन्सन



लहान असताना मी जपानच्या दक्षिण बेटावरील एका शाळेत शिकत होतो. एका उंच हिरव्यागार डोंगराच्या पायथ्यापासून वर साधारण अर्ध्या मैलावर ही शाळा होती. आमच्या शाळेची इमारत लाकडापासून बनली होती. काळ सरला तसा इमारतीचा रंग विटत गेला. वेगवान वारे वाहू लागले की शाळेजवळच्या झाडांमधून शिट्टी वाजवल्यागत आवाज येत असे आणि इमारत जुनाट जहाजासारखी कुरकुरत असे. शाळेच्या मैदानातून आमचा गाव, बंदरावरील जहाजं आणि चमचमणारा समुद्र दिसत असे.



वसंत ऋतूत एकदा शाळेत स्पर्धा भरवल्या होत्या. पहिल्या घंटेआधीच सर्व शिक्षक आणि मुलं शाळेच्या मैदानात जमले होते.

“सगळ्यांनी डोक्यावर बांधायची पट्टी आणली का?” श्रीमती *मोरिता* यांनी विचारलं. त्या आमच्या पहिलीच्या वर्गाच्या शिक्षिका होत्या. आम्ही उत्साहाने त्यांना आपापल्या पट्टया दाखवल्या. त्या एका बाजूला लाल आणि दुसऱ्या बाजूला पांढऱ्या होत्या. “लक्षात ठेवा, आपण लाल गटात आहोत,” त्या आम्हाला म्हणाल्या.



आम्ही शाळेतले सगळेच्या सगळे झाडू आणून खेळाचं मैदान साफ केलं. आम्ही मैदानातल्या बांबूच्या खांबांवर रंगीबेरंगी झेंडे आणि पताका लावल्या. आम्ही खडूच्या पावडरने मातीत धावण्याच्या शर्यतीसाठी पांढऱ्या रेघा काढल्या.

आमचे आईवडील आमच्यासाठी जेवणाचे डबे आणि चहा घेऊन शाळेत आले. सगळे पालक पांढऱ्या रेघांशेजारी आपल्या चटया टाकून बसले.



सगळी तयारी झाल्यावर श्रीमती मोरिता यांनी घंटा वाजवली. नऊ वाजले होते. एका मंचावर उभे राहून शाळेचे प्रिन्सिपल बोलू लागले, “पालकांनो, मुलांनो आणि माझ्या शिक्षक मित्रांनो, आज आपण इथे खिलाडू वृतीची भावना बाळगून जमलो आहोत. आपण जिंकू वा हरू, पण खेळाची मजा मात्र लुटू.”

आम्ही सर्वांनी जोरजोरात टाळ्या वाजवल्या.

सुरुवातीला सर्वात लहान मुलांची शर्यत झाली. आळीपाळीने सहासहा मुलं आरंभ रेषेवर जाऊन उभी राहिली.



“एक, दोन, तीन, पळा!” कला शिक्षक, श्रीयुत *ओका*, वरच्या पट्टीत ओरडले. आम्ही पहिलीच्या वर्गाची मुलं वेगात दौडू लागलो. पालक आणि शिक्षक आमच्यासोबत पळू लागले आणि मोठमोठ्याने ओरडून आम्हाला प्रोत्साहन देऊ लागले. वरच्या वर्गातील मुलं झेंडे आणि डोक्याच्या पट्ट्या फडकावू लागले आणि बेंबीच्या देठापासून ओरडू लागले. त्यांचा गोंगाट ढगांच्या गडगडाटासारखा डोंगरात घुमू लागला.



शर्यतीत जिंकलेली मुलं परीक्षकांच्या टेबलजवळ गेली आणि प्रिन्सिपलकडून बक्षीस घेऊ लागली. बक्षीसांवर पांढऱ्या कागदाचं आवरण होतं आणि त्यांना सोनेरी फितीने बांधलं होतं. आतमध्ये, संत्री, केक आणि पेन्सिली होत्या.



सहावीतल्या मुलांच्या शर्यती संपल्या तेव्हा जेवणाची वेळ झाली. स्पर्धेचा हा भाग सर्वात छान होता. माझ्या आईने दोन दिवस तयारी करून रुचकर पदार्थ बनवले होते. जेवणाच्या डब्यांमध्ये टरबुजाच्या सालीचं लोणचं, अंड्याचे रोल, मसाले भात आणि माशाचे केक होते. सफरचंद, पीच आणि विविध प्रकारची मिठाईसुद्धा डब्यांमध्ये होती.





दुपारी, आम्ही रस्सीखेच आणि पाठीवर एका मुलाला बसवून धावण्याचा खेळ खेळलो. त्यानंतर मोठ्या माणसांची शर्यत झाली.



आईवडील आणि शिक्षकांच्या जोड्या बनवण्यात आल्या. त्यांचे एकएक पाय एकत्र बांधले. पळताना ते अडखळून एकमेकांवर पडले तेव्हा आम्ही मजेत किंचाळलो.



श्रीमती मोरिता आणि कुणाचेतरी वडील यांच्या जोडीला आम्ही प्रोत्साहन देऊ लागलो. तेवढ्यात मैदानावर शांतता पसरली. आमचं हलणं-डुलणं, बोलणं थांबलं आणि आम्ही प्रवेशद्वाराकडे एकटक पाहू लागलो.

तिथे मैदानाच्या कुंपणाला रेलून दोन अनोळखी माणसं आमच्या शर्यती बघत होती. ते अमेरिकी सैनिक होते. त्यातला एक गोरा होता आणि त्याचे केस लालभडक आगीसारखे चमकत होते. दुसऱ्या माणसाचा चेहरा कोळशासारखा काळा होता. त्यांनी गडद रंगाचे कपडे आणि त्यावर नेकटाय घातले होते. त्यांच्या डोक्यावर मऊशार टोप्या होत्या. त्यांच्या हातांवर लाल फिती होत्या. त्यांच्याकडे बंदुका नव्हत्या.

"किती काळा आहे तो!"

"किती लाल-लाल आहेत त्याचे केस!" आमची कुजबूज सुरू झाली.

काही महिन्यांपूर्वीच युद्ध थांबलं होतं. अद्याप एक वर्षदेखील झालं नव्हतं. बंदरात अमेरिकी सैनिकांचा तळ होता. पण आम्ही अमेरिकी सैनिकांना कधी डोंगरावर बघितलं नव्हतं. मला भीती वाटू लागली.



सैनिकांनी आमच्याकडे पाहून स्मित केलं आणि आपले हात हलवले. तो काळा सैनिक कुंपण ओलांडून आमच्याकडे आला तेव्हा आम्ही मागे सरकून त्याच्याकडे टक लावून पाहू लागलो. आम्ही त्याच्याएवढा उंच माणूस कधी पाहिला नव्हता. त्याचे बूट गुळगुळीत धातुसारखे चमकदार होते.

तो सैनिक लांब लांब ढांगा टाकत शाळेच्या प्रवेशद्वाराकडे गेला. तिथे प्रिन्सिपलची सायकल उभी होती. मग सायकलकडे बोट दाखवून तो परीक्षकांकडे वळला. प्रिन्सिपल सावकाशपणे उठून उभे राहिले.

“त्याला सायकल पाहिजे,” कुणीतरी म्हणालं.

“कदाचित त्याला सायकल विकत घ्यायची आहे.”

“नाही, त्याला सायकल चालवायची आहे वाटतं.”



प्रिन्सिपल अमेरिकी सैनिकाजवळ आले आणि त्यांनी त्याला नमस्कार केला. ते या महाकाय माणसासमोर अगदी लहान मुलासारखे दिसत होते. उंच सैनिकाने त्यांना झुकून नमस्कार केला. प्रिन्सिपलच्या डोक्याशी त्याची टक्कर होता-होता वाचली. आम्ही फिदीफिदी हसू लागलो.

ते दोघे हातवारे करून एकमेकांशी बोलू लागले. प्रिन्सिपलने आधी सायकलकडे आणि मग सैनिकाकडे बोट केलं आणि आपली मान हलवली. तुम्ही माझी सायकल खुशाल चालवू शकता, असं ते म्हणाले असावेत. सैनिकाने आपले हात जोडून स्मित केलं.



सैनिकाने सायकलचं हँडल पकडलं आणि पायाने किक मारून त्याचा स्टँड काढला. मग तो सायकल ओढत ओढत मैदानाच्या मध्यभागी घेऊन गेला. त्याने आम्हाला दूर उभं राहाण्याचा इशारा केला आणि आपल्या मित्राला आत बोलावलं.

तो दुसरा सैनिकसुद्धा काळ्या सैनिकासारखाच उंच होता. त्याने आपली टोपी डोक्यावरून उतरवली आणि झुकून आम्हाला नमस्कार केला. आम्ही झुकून हसत हसत त्याला प्रतिसाद दिला. शेवटी एकमेकांशी बोलून सैनिकांनी माना हलवल्या.



काळ्या माणसाने त्याचं जॅकेट उतरवून मित्राच्या हातात दिलं. मग आपली लांब टांग वर उचलून तो सायकलवर स्वार झाला. सायकल चालवत तो मैदानात गोल फेऱ्या मारू लागला. त्याच्या मित्राने त्याचं जॅकेट झेंड्यासारखं हलवलं आणि त्याला वेगात चालवण्यास प्रोत्साहन दिलं.



अचानक सायकलस्वाराने सायकलचं हँडल वर खेचून पुढचं चाक जमिनीपासून वर हवेत उचललं.

"अरे बापरे!" आम्ही ओरडलो.

"अशी कशी चालवतो हा सायकल?"

"व्वा! काय कसरत आहे!" कला शिक्षक म्हणाले.



लाल केसांचा सैनिक रिंगमास्टर होता. तो सायकलच्या शेजारून धावत मित्राला प्रोत्साहन देत होता. सायकलस्वाराने सायकल एकाच चाकावर वेडीवाकडी चालवत गोल फेऱ्या मारल्या. आम्ही आश्चर्यचकीत झालो.



मग सायकलस्वार हँडलला पाठ करून बसला आणि सायकल चालवू लागला. सायकल कुठे जात आहे, हे त्याला वळून वळून बघावं लागत होतं. एखाद्या मोठ्या कोळ्यासारखं तो आपले हात-पाय हलवत होता. आम्ही दंग झालो आणि मोठमोठ्याने ओरडू लागलो.



त्याने सायकल मागे चालवली, पुढे चालवली, पुढचं चाक गायरोस्कोपसारखं गरगर फिरवत चालवली. त्याने ओरडून रिंगमास्टरला काहीतरी सांगितलं. त्याच्या मित्राने सायकलच्या मागचं कॅरियर पकडून, शक्य तितका जोर लावून सायकलला धक्का दिला आणि सायकल सोडून दिली.



आता सायकल मोठ्या वेगाने धावू लागली. सायकलस्वार पेंडलवर उभा राहिला, सायकलच्या हँडलवर रेलला. मग त्याने आपले दोन्ही पाय उचलून मागे कॅरियरवर ठेवले.



आता त्याचं शरीर हवेत होतं. त्याची टोपी उडाली आणि नेकटाय हवेत फडफडू लागला. तो एखाद्या मोठ्या ड्रॅगनफ्लायसारखा हवेत मुक्तपणे तरंगू लागला. “व्वा रे, व्वा!” आम्ही श्वास रोखून ओरडू लागलो.



शेवटी सायकलस्वार थांबला तेव्हा मैदान टाळ्यांच्या कडकडाटाने आणि लोकांच्या जयघोषाने गजबजून गेलं. सायकलस्वार धापा टाकत हसत उभा होता. रिंगमास्टर त्याच्याकडे धावला आणि त्याने त्याला वर उचललं. आम्ही त्यांच्याभोवती गर्दी केली आणि उड्या मारत ओरडू लागलो.

गर्दीतून कशीबशी वाट काढत प्रिन्सिपल पुढे आले. काळा सैनिक त्यांच्याजवळ गेला. दोघांनी जुने मित्र असल्यासारखं हात मिळवले.

प्रिन्सिपलने आपला हात उचलून आम्हाला शांतता राखण्यास सुचवलं. त्यांनी सैनिकाचा हात धरून त्याला मंचाजवळ नेलं. मग ते श्रीमती मोरिताजवळ काही कुजबुजले. श्रीमती मोरिता यांनी टेबलजवळ जाऊन बक्षीसाचा सर्वात मोठा खोका आणला.



प्रिन्सिपल मंचावर उभे राहिले आणि त्यांनी ते बक्षीस अमेरिकी सैनिकांना दिलं. त्यावेळी ते एखाद्या महान विजेत्याला पुरस्कार प्रदान करणारे मोठे सम्राट वाटत होते.

सायकलस्वाराने दोन्ही हातांनी बक्षीसाचा स्वीकार केला आणि ते आपल्या डोक्यावर उचलून धरलं. मग तो आम्हा मुलांच्या गर्दीकडे वळला.



“धन्यवाद, खूप खूप धन्यवाद,” तो म्हणाला. सगळ्यांनी झुकून त्याचं अभिनंदन केलं आणि एका सुरात त्याचा जयघोष केला.

अमेरिकी सैनिकांनी आपल्या टोप्या डोक्यावर चढवल्या आणि ते बक्षीस घेऊन प्रवेशद्वारातून बाहेर पडले. त्यांनी मागे वळून आमच्याकडे बघत हात हलवले आणि ते हसत-खिदळत डोंगरावरून खाली उतरू लागले. ते रस्त्याच्या वळणाआड होईपर्यंत आम्ही त्यांना टक लावून पाहात राहिलो.

समाप्त

